**मा. राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना सेवानिवृत्ती नंतर दूरध्वनी भत्ता.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१७/प्र.क्र.१०९/कार्या-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ जानेवारी, २०१९

**वाचा:** १. सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआयसी२००६/१३२२/सीआर०४/०७/५, दिनांक ७ सप्टेंबर, २००५चे दोन स्वतंत्र शासन निर्णय
२. सचिव, राज्य माहिती आयोग यांचे पत्र क्र.आस्था२०१४/प्र.क्र.१४/०२, दिनांक १६.५.२०१७
३. सचिव, राज्य माहिती आयोग यांचे पत्र क्र. मुमाआ२०१८/प्र.क्र.१४/०१, दिनांक ५.१२.२०१८

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ७.९.२००७ अन्वये राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्या सेवा व शर्ती विहित केल्या आहेत. त्यानुसार सेवानिवृत्तीनंतर अनुज्ञेय असलेल्या सुविधाअंतर्गत त्यांना निवासी दूरध्वनी अनुज्ञेय असून दरमहा १५०० कॅालपर्यंत दूरध्वनी परताव्याची रक्कम अनुज्ञेय आहे. त्याऐवजी राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना सेवानिवृत्तीनंतर दरमहा दूरध्वनी भत्त्याची ठोक रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना सेवानिवृत्तीनंतर अनुज्ञेय असलेल्या सुविधाअंतर्गत दरमहा दूरध्वनी परताव्याऐवजी दूरध्वनी भत्त्याकरिता रु.१,६१०/- (रुपये एक हजार सहाशे दहा फक्त ) इतकी ठोक रक्कम अदा करण्यात यावी.

२. उपरोक्त बाबी करिता येणारा खर्च “मागणी क्र.ए-४. २०७०- इतर प्रशासनिक सेवा, (००) (०९) राज्य माहिती आयोग, ०१ वेतन (२०७० ०७८२)” या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५१०/२०१८व्यय-४, दिनांक ८ जानेवारी, २०१९अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११७१६२१५४६५०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chhaya Kiran Wadte

Digitally signed by Chhaya Kiran Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f311bd8712a7b94b3b73d0e88ad01cf3a49c098bcd5f62e16e7135388baa523c, serialNumber=5bac345149360802f8cd3e4ab4ec174f2fec1bff420e81931e638ee6cdfcc12d, cn=Chhaya Kiran Wadte
Date: 2019.01.17 16:32:11 +05'30'

**( छा.कि.वडते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल १/२ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) सचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, मुख्यालय, मुंबई

५) उपसचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, बृहन्मुंबई/ कोकण(नवी मुंबई)/ पुणे /नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद / नागपूर

६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

७) वित्त विभाग (व्यय-४/विनियम)

८) निवड नस्ती कार्यासन सहा, सामान्य प्रशासन विभाग.